**१९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या लातुर जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ च्या प्रकरणी मा. न्यायालयाने दिलेल्या आदेशान्वये वाढीव मोबदल्यांच्या न्यायालयीन प्रकरणात मा.उच्च न्यायालयात प्रतिभूती ठेवी जमा करणेबाबत.**

**(८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी)**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग ( मदत व पुनर्वसन )**

**शासन निर्णय क्रमांक : वामोनि-२०२३/प्र.क्र.२६/आव्यप्र-२,**

पहिला मजला, मुख्य इमारत,

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई.

दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२३.

संदर्भ - १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) क्रमांक:आव्यप्र-२०१६/प्र.क्र.३६/आव्यप्र-२, दि.२७ एप्रिल,२०१६.

२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक: न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३ जून,२०१५.

३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे आदेश जा.क्र.२०२२/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.५२, दि. ३१.१०.२०२२.

**प्रस्तावना :**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या लातुर जिल्हयातील भूकंपग्रस्त गावांचे नवीन गावठाण पुनर्वसनासाठी शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना ठरवून दिलेली जमिनीची रक्कम मा.दिवाणी न्यायालय यांनी विविध भूसंदर्भांमध्ये वाढीव मोबदला दिलेला आहे, परंतु सदर प्रकरणात अर्जदार तथा एल ऐ आर धारक यांना या संपादित जमिनीचा मोबदला मान्य नसल्याने मा.उच्च न्यायालयात अपील्स दाखल केली आहेत. यावर मा.उच्च न्यायालयाने आदेशांद्वारे न्यायालयात ठेव स्वरुपात निधी जमा करण्याचे आदेश दिलेले आहेत. अशा प्रकरणात लातुर जिल्ह्यातील संपादीत करण्यात आलेल्या जमिनींचा, भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ खाली सुधारीत परिगणनेनुसार,वाढीव मोबदला म्हणून रक्कम मा.न्यायालयात ठेव स्वरुपात जमा करण्यासाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या लातुर जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ च्या प्रकरणी प्रकरणी दिवाणी न्यायालयाने दिलेल्या दिलेल्या निर्णया विरूध्द मा. उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या प्रथम अपील प्रकरणांत संबंधित भूधारकांना मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या (Conditional Order) आदेशान्वये वाढीव मोबदला म्हणून खालील तक्त्याप्रमाणे एकूण रक्कम रु. ५१,८४,६५८/- (ऐकावन्न लक्ष चौऱ्याऐंशी हजार सहाशे अठ्ठावण) इतकी रक्कम मा. उच्च न्यायालयात प्रतिभूती ठेव म्हणून जमा करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे:-

| अ. क्र. | भूधारकांचे नाव | एल.ए. आर. क्र. | संपादित केलेल्या गावाचे नाव | रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १. | नागनाथ अमृता जाधव | ११/२००० | मौजे दादगी, ता. निलंगा जि. लातुर | १६,४२,७८५ |
| २. | महादा मुदाप्पा बोयणे (मयत), वारस गुंडाजी महादा बोयणे (मयत वारस), प्रकाश गुंडाजी बोयणे | ९/२००० | मौजे दादगी, ता. निलंगा जि. जि. लातुर | ९,६७,०१८ |
| ३. | राम धोंडीबा बोयणे | १०/२००० | मौजे दादगी, ता. निलंगा जि. लातुर | ४,८९,३३७ |
| ४. | नागनाथ ग्याना बोयणे | ८/२००० | मौजे दादगी, ता. निलंगा जि. जि. लातुर | १०,३६९२९ |
| ५. | संतराम ग्याना बोयणे(मयत वारस)शाहुराज संतराम बोयणे. | १२/२००० | मौजे दादगी, ता. निलंगा जि. जि. लातुर | १०,४८,५८९ |
| **एकूण** | | | | ५१,८४,६५८/- |

**२.** याबाबतीत होणारा खर्च हा “८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संगणक संकेतांक ८६७४ ००१९)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**३.** वर उल्लेखित लेखाशीर्षाखाली देण्यात आलेली मंजुरी ही अंतरीम आहे. जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा अंतिम निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयातून काढून त्या रकमेचा भरणा “८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा” या लेखाशीर्षाखाली करावा लागेल.

**४.** जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द लागला तर सदरहू रक्कम “मागणी क्र. सी -६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०६, भुकंप, १०१, अनुग्रह सहाय्य, (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०१) भूकंपग्रस्तांसाठी सहाय्य (२२४५ २४८१) ३१, सहाय्यक अनुदाने” या लेखाशीर्षाखाली जमा दर्शवून खर्च या अंतिम लेखाशीर्षाखाली टाकावा लागेल व त्या परिस्थितीत संबंधित जिल्हाधिकारी आवश्यक रकमेच्या मंजुरीबाबतचा रीतसर प्रस्ताव शासनास सादर करतील व अर्थसंकल्पीय तरतूद करवून घेतील.

**५.** संबंधीत जिल्हाधिकारी यांनी वरिष्ठ न्यायालयातील अपिलाचा निकाल लागल्याबरोबर या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही खातेदारास कोणत्याही प्रकरणी दुहेरी फायदा/प्रदान मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास पाठवावा.

**६.** **ज्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयात अनामत रक्कम भरण्याचे मा.उच्च न्यायालयाचे विवक्षित आदेश नाहीत, अशा प्रकरणी “८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी” या शिर्षाखाली निधी उपलब्ध करता येणार नाही, याची दक्षता घ्यावी.**

**७.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाने शासन निर्णय क्र.न्याकभ-१०.०६/प्र.क्र.४६/अर्थसंकल्प-२,दिनांक २९.०७.२००६ अन्वये महसूल व वन विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन तसेच वित्त विभाग परिपत्रक क्रमांकःन्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५ अन्वये लेखाशिर्ष "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" या लेखाशीर्षाखाली भूसंपादन अधिनियम,१८९४ मधील कलम १८ खालील वाढीव मोबदला उपलब्ध करुन देणेबाबत प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

८. दि.१५.०२.२००३ रोजी मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने प्रथम अपील क्र.११२३/२००२ मधील सिव्हील अर्ज क्र.७९६०/२००२ मध्ये सूचित केल्याप्रमाणे नियुक्त करण्यात आलेल्या उच्चस्तरीय चौकशी समितीचे धोरण/ निर्णय या प्रकरणी लागू राहील.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४८/२०२३/व्यय-९, दि.०७.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२२१८०२५७०३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP NAMDEO KAMBLE

Digitally signed by SANDEEP NAMDEO KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804,
pseudonym=E14A6C7BDC7544D127BE94A39CB259A8518EA959,
serialNumber=BA1E056AD55B2F343783A4C13760C8EEF1236DF77EBD34A5CC6127A29F1650B1, cn=SANDEEP NAMDEO KAMBLE
Date: 2023.02.22 18:53:51 +05'30'

**( संदीप ना. कांबळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) जिल्हाधिकारी,लातुर.
३) भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, निलंगा,जि.लातुर.
४) कोषागार अधिकारी,लातुर.
५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर(प्रत्येकी २ प्रती)
६) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/व्यय-१/अर्थोपाय कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
७) मा.मंत्री (भु.पु.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीस्तव सादर.
८) अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती, आव्यप्र-२.